विटा नगरपरिषदेच्या मालकीची सि.स. नं. २७३ ही जागा सार्वजनिक आरोग्य विभागास उपजिल्हा रुग्णालय बांधकाम करण्यासाठी हस्तांतरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- संकीर्ण-२०२५/प्र.क्र.५०/नवि-१८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २१ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ:-**१)शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.श्रेणीवर्धन-२०२३/प्र.क्र.२६९/आरोग्य-४, दिनांक ०५/१२/२०२३
२) नगरपरिषद विटा यांच्याकडील ठराव क्र. ४५, दिनांक २८/०८/२०२४
३)नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांचे पत्र क्र. नपप्रसं/का.०७अ/विटा नप/जागा हस्तांतरण/२०२४/८५७, दिनांक ०५/०२/२०२५

**प्रस्तावना:-**

विटा नगरपालिकेच्या हद्दीतील सि.स. नं. २७३ ही जागा श्री. जयसिंग शितोळे व इतर यांनी सार्वजनिक दवाखाना उभारण्यासाठी दि. १६.०६.१९५८ रोजी नगरपरिषदेस दानपत्राद्वारे हस्तांतरित केलेली आहे. सदर जागेवर पूर्वी प्राथमिक आरोग्य केंद्र कार्यरत होते. दरम्यान ग्रामीण रुग्णालय विटाचे संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करण्यात आले आहे.

सदरचे जागेवर उपजिल्हा रुग्णालयाच्या बांधकामाकरीता सदरची जागा जिल्हा शल्यचिकित्सक, सांगली यांच्या कार्यालयाच्या नावावर करण्याबाबत जिल्हा शल्यचिकित्सक, सांगली यांच्याकडून विनंती करण्यात आली होती.

विटा नगरपरिषदेच्या दि.२८.०८.२०२४ रोजीच्या सर्व साधारण सभेतील ठराव क्र. ४५ नुसार, नगरपालिकेच्या मालकीची सदरची जागा उपजिल्हा रुग्णालय बांधणेसाठी जिल्हा शल्य चिकित्सक, सांगली यांचेकडे नगरपरिषद कायदा, १९६५ कलम ९२ नुसार हस्तांतरीत करण्यास मंजूरी दिलेली आहे.

उपरोक्त बाबी विचारात घेऊन सदर जागा रु.१/- प्रतिमाह नाममात्र भाड्याने उपजिल्हा रुग्णालयासाठी देण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

विटा नगरपरिषद हद्दीमधील सिटी सर्व्हे क्रमांक २७३ मधील ८० आर जागा "उपजिल्हा रुग्णालय" बांधकाम करण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभागास महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ चे कलम ९२ (१) व व कलम ३१६ (ड) अन्वये, तसेच महाराष्ट्र नगरपरिषदा (स्थावर मालमत्तेचे हस्तांतरण) नियम, १९८३ च्या नियम २१ व नियम २६ मधील तरतूदीनुसार कायमस्वरुपी भाडेतत्त्वावर रुपये १/- प्रतिमहा नाममात्र भाड्याने खालील अटी व शर्तीनुसार देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**<u>अटी/ शर्ती</u>:-**

१) प्रस्तावित जागेसंदर्भात उपजिल्हा रुग्णालय बांधण्याच्या प्रयोजनासाठी नगरपरिषदेने सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्यासमवेत जागेचा करार करुन प्रत्यक्ष जागा त्यांच्या नावे हस्तांतरण करण्याची कार्यवाही करावी.

२) सार्वजनिक आरोग्य विभागाने सदरची जागा हस्तांतरीत करण्यासाठी तसेच नगरपरिषद विटा यांच्या समवेत करार करण्यासाठी सक्षम प्राधिकाऱ्याची नियुक्ती करावी.

३) सदर जागा उपजिल्हा रुग्णालय या प्रयोजनासाठी हस्तांतरीत करण्यात येत असून जागेचा इतर कोणत्याही प्रयोजनासाठी वापर करता येणार नाही. जागेचा वापर प्रस्तावित प्रयोजनासाठी होत नसल्यास सदरील जागा आहे त्या स्थितीत नगरपरिषद विटा यांच्याकडे हस्तांतरीत करावी लागेल.

४) सदर जागेवर पूर्वी असलेल्या प्राथमिक आरोग्य केंद्राच्या थकित घरपट्टी व पाणीपट्टीची रक्कम सार्वजनिक आरोग्य विभागाने नगरपरिषदेस अदा करावी.

५) वरील अटी / शर्ती नुसार विटा नगरपरिषदेने सार्वजनिक आरोग्य विभागासोबत करारनामा करावा.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०२२११७३८२४६१२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIRUDDHA
VENKTESH JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
Date: 2025.02.21 17:40:27 +05'30'

**(अनिरुध्द व्यं. जेवळीकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, बेलापूर, नवी मुंबई.
८. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, पुणे विभाग, पुणे.
९. जिल्हाधिकारी, सांगली.
१०. मुख्याधिकारी, नगरपरिषद विटा, जि. सांगली.